



महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७ Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

क्रमांक:-गौखनि-३५/१०२३/प्र.क्र.५४/ख-१ दिनांक :- ०५ मार्च, २०२४.

विषय : गौण खनिज- सातारा

सन २०१८-१९ या वर्षाकरीता मौजे म्हसवड-२ (लगत गट नं.११८१,११६७,१२२६) येथील भूखंड क्र.२, ता. माण, जि. सातारा या वाळूगटातून उत्खनन करता न आलेल्या वाळूची रक्कम परत मिळणेबाबत.

**मे. युनिटी एशियन (डब्ल्यु) कन्स्ट्रक्शन कंपनी, मुंबई तर्फे श्री संतोष प्रल्हाद थोरात.**

**शासन ज्ञापन:**

मौजे म्हसवड-२ (गट नं ११८१.११६७,१२२६) ता. माण जि. सातारा हा वाळू गट १३२५ ब्रास परिमाणकरीता प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेअंतर्गत वांग मध्यम प्रकल्प, सातारा या कामाकरिता अपर जिल्हाधिकारी, सातारा यांनी दिनांक ०९/०८/२०१९ च्या आदेशान्वये मंजूर केला होता. सदर वाळू गटाचा ताबा तहसिलदार माण (दहिवडी) यांनी दि.१६/०८/२०१९ रोजी निविदाधारक यांना दिला.

०२. तथापि, अधिकारी / अभियंता व कर्मचारी वर्ग अपुरा असल्याने वाळू गट आरक्षित करताना घतलेल्या अटी व शर्तीचे पालन करणे शक्य होणार नसल्याने सदर वाळू गट रद्द करण्याची विनंती सहा. अधिक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ यांनी केली होती. त्यानुषंगाने अपर जिल्हाधिकारी, सातारा यांनी सदर वाळू घाट दिनांक २३/०८/२०१९ च्या आदेशान्वये रद्द केला. तसेच, तहसिलदार, माण (दहिवडी) यांनी सदर वाळूगटाचा ताबा ताबापावती करुन घेतला आहे.

०३. सबब, मौजे म्हसवड-२ (लगत गट नं.११८१,११६७,१२२६) येथील भूखंड क्र.२, ता. माण, जि. सातारा या वाळू गटामधून उत्खनन करता न आलेल्या वाळूपोटी ठेकेदार मे. युनिटी एशियन (डब्ल्यु) कन्स्ट्रक्शन कंपनी मुंबई रु.६४,१४,८१७/- (रुपये चौसष्ठ लाख चौदा हजार आठशे सतरा फक्त) इतकी रक्कम परत करण्याचा शासनाने निर्णय घेताला आहे.

०४. सबब, लिलावधारक लिलावधारक मे. युनिटी एशियन (डब्ल्यु) कन्स्ट्रक्शन कंपनी, मुंबई तर्फे श्री संतोष प्रल्हाद थोरात यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन करता न आलेल्या वाळूची रक्कम रु.६४,१४,८१७/- (रुपये चौसष्ठ लाख चौदा हजार आठशे सतरा फक्त) इतकी अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.०८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३०५१८३२५८१९१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.03.05 18:42:39 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
**जिल्हाधिकारी, सातारा**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन,१०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन,१०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी,सातारा
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवडनस्ती